**भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) जलसंपदा विभागांतर्गत कनिष्ठ अभियंता (विद्युत) गट-ब (अराजपत्रित) या संवर्गातील नामनिर्देशनाच्या कोट्यातील पदे सरळसेवेने भरण्यासाठी राज्यस्तरीय निवड समितीची स्थापना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-११२३/प्र.क्र.४५/२०२३/आ.(तांत्रिक)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- १६ मार्च, २०२३.

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.प्रानिमं-१२२२/प्र.क्र.५४/का.१३-अ, दि.४ मे, २०२२.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०२२/प्र.क्र.२/२०२२/आ.पु.क., दि.३१ ऑक्टोबर, २०२२.

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.प्रानिमं-१२२२/प्र.क्र.१३६/का.१३-अ, दि.२१ नोव्हेंबर, २०२२.

प्रस्तावना :-

भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड संवर्गातील नामनिर्देशनाच्या कोटयातील पदे सरळसेवेने भरतीबाबतच्या एकत्रित मार्गदर्शक सूचना सामान्य प्रशासन विभागाने दि.०४.०५.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या आहेत. त्यानुसार नमूद पदांच्या भरतीकरिता प्रादेशिक व राज्यस्तरीय निवड समित्यांची रचना सदरहू शासन निर्णयामध्ये विहित केल्यानुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभागाने प्रादेशिक व राज्यस्तरीय निवड समित्या स्थापन करावयाच्या आहेत. विभागांतर्गत रिक्त पदे भरण्याबाबतचा कालबध्द कार्यक्रम संदर्भ क्र.२ येथील दि.३१ ऑक्टोबर, २०२२ च्या शासन निर्णयान्वये विहीत केलेला असून त्यानुसार विभागाचा आकृतिबंध अद्याप अंतिम झालेला नसल्यामुळे सरळसेवेच्या कोट्यातील ८०% रिक्त पदे भरण्याबाबतची कार्यवाही दि.१५.०८.२०२३ पूर्वी करावयाची आहे. त्यानुसार कनिष्ठ अभियंता (विद्युत) या गट-ब (अराजपत्रित) संवर्गातील नामनिर्देशनाच्या कोटयातील पदे सरळसेवेने भरण्याबाबत राज्यस्तरीय निवड समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

जलसंपदा विभागांतर्गत क्षेत्रीय कार्यालयातील गट-ब (अराजपत्रित) संवर्गातील नामनिर्देशनाच्या कोटयातील कनिष्ठ अभियंता (विद्युत) हे पद सरळसेवेने भरण्याकरीता राज्यस्तरीय निवड समितीची रचना पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे.

**राज्यस्तरीय निवड समिती**
**गट-ब (अराजपत्रित) संवर्गातील कनिष्ठ अभियंता (विद्युत)**
**(वेतनश्रेणी :- एस-१४ : ३८६००-१२२८००)**

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, जलसंपदा विभाग, मुंबई | अध्यक्ष |
| २ | अ.जा./अ.ज./इ.मा.व. यामधून अधीक्षक अभियंता (विद्युत) / कार्यकारी अभियंता (विद्युत) संवर्गातील एक अधिकारी | सदस्य |
| ३ | अल्पसंख्याकामधून अधीक्षक अभियंता (विद्युत)/ कार्यकारी अभियंता (विद्युत) संवर्गातील एक अधिकारी (गट-अ संवर्गातील अल्पसंख्याक अधिकारी उपलब्ध होत नसल्यास गट-ब राजपित्रत संवर्गातील अधिकारी) | सदस्य |
| ४ | मुख्य अभियंता (विद्युत), जलसंपदा विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अधीक्षक अभियंता (विद्युत) संवर्गातील अधिकारी. | सदस्य सचिव |
| टिप १ :- सर्वसाधारण किंवा उपरोक्त प्रवर्गापैकी कोणत्याही प्रवर्गामधील एक प्रतिनिधी महिला असणे अनिवार्य. | | |
| टिप २ :- निवड समिती गठीत करताना वरील अटींची पूर्तता होत नसल्यास निवड समितीमध्ये अतिरिक्त सदस्यांची नियुक्ती करून सदर अटींची पूर्तता करण्यात यावी. | | |

भरती प्रक्रिया राबविण्यासंदर्भातील एकत्रित मार्गदर्शक सूचना सामान्य प्रशासन विभागाने दि.०४.०५.२०२२ व दि.२१.११.२०२२ आणि वित्त विभागाने दि.३१.१०.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या आहेत. त्यानुसार सामान्य प्रशासन विभाग, वित्त विभाग व जलसंपदा विभागाने वेळोवेळी दिलेल्या / देण्यात येणाऱ्या सूचनांनुसारच भरती प्रक्रिया राबविणे आवश्यक आहे. पदभरती करतांना शासनाने विहित केलेली कार्यपध्दती, सेवाप्रवेश नियम, सर्व प्रकारचे आरक्षण, बिंदूनामावली यासंदर्भातील नियम व आदेश विचारात घेऊनच पदे भरण्याची कार्यवाही करण्याची दक्षता घेण्यात यावी. मार्गदर्शक सूचनांमध्ये दिल्याप्रमाणे वेळोवेळी शासनाची पूर्वमान्यता घेणे बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३१६१५३७०२७२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MANGESH RAMDAS BAGDE

Digitally signed by MANGESH RAMDAS BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=10a4eba53d6cf4eecf749d5d71a069a321cba021994969cce3b86ba15bfeb4a3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2E7C3977D5A2A1A7E29FF2889A72947DE46CD8FFC991D80ABDDD9FF5803E9298, cn=MANGESH RAMDAS BAGDE
Date: 2023.03.17 18:00:19 +05'30'

**( मंगेश बागडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, जलसंपदा विभाग, मुंबई.

८) सर्व अधीक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी, जलसंपदा विभाग, ठाणे, औरंगाबाद, पुणे, कोल्हापूर, अमरावती, नाशिक, नागपूर.

९) आस्था (शा.अ.), आस्था (सं.नि.), आस्था (वर्ग-२), जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.

१०) आ.(तांत्रिक) संग्रहार्थ.